सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरण करणेबाबत.
शेतकऱ्यांना अल्पमुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५१५०१)-३३ अर्थसहाय्य

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं ०६२१/ प्र.क्र. ७१/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४ डिसेंबर, २०२१

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र.२४७/२-स, दिनांक १७/०५/२००६.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६.
३. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४/१०/२०२१.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची पत्रे जा.क्र.कृषीपत-८/निधी मागणी/२०२१-२२/२१, दिनांक १८/०६/२०२१ आणि जा.क्र.कृषीपत-०८/ मजोफुशेकयो/उप. प्रमाणपत्रे/२०२१, दिनांक २६/०८/२०२१

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ अन्वये राज्य शासनाने राज्यातील शेतकऱ्यांना ६% व्याज दराने अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा होण्यासाठी शासकीय अर्थसहाय्याचा निर्णय घेतलेला आहे. या निर्णयानुसार, केंद्र शासनाचे धोरणानुसार बँका ज्या ठिकाणी शेतकऱ्यांना ७% व्याज दराने कर्ज पुरवठा करणार आहेत, त्या ठिकाणी बँकांनी ७% ऐवजी शेतकऱ्यांना ६% व्याज दराने कर्ज पुरवठा करावा, असे राज्य शासनाचे धोरण आहे. या प्रयोजनासाठी १% व्याज फरकाच्या रक्कमेचा आर्थिक भार शासनावर आहे. सन २००६-०७ पासून खरीप व रब्बी हंगामामध्ये राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, राष्ट्रीयकृत बँका आणि प्रादेशिक ग्रामीण बँका व सन २०१३-१४ पासून शेतकऱ्यांना रूपये ३.०० लाखापर्यंत अल्प मुदत पीक कर्ज वाटप करणाऱ्या खाजगी बँकांना या निर्णयाचा लाभ देण्यात येत आहे.

राज्य शासनाच्या धोरणास अनुसरून शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का दराने अर्थसहाय्य (लेखाशिर्ष २४२५१५०१) या योजनेअंतर्गत रू.१२५००.०० लाख एवढी अर्थसंकल्पीय तरतूद सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर आहे. त्यापैकी ५०% निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या वर्षात शेतकऱ्यांना अल्प मुदत पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १ टक्का व्याज दराने अर्थसहाय्य (२४२५ १५०१)-३३ अर्थसहाय्य खाली रू. १२५००.०० लाख इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. त्यापैकी ५०% निधी म्हणजेच रू.६२५०.०० लाख (रूपये बासष्ट कोटी पन्नास लाख) निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दर्शविली आहे.

२. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा प्रशा-५, दिनांक १०/०५/२०१६ अन्वयेच्या परिच्छेद "अ" नुसार या प्रकरणीची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

(१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभागाने विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार सादर करण्यात येत आहे.

(२) **मंजूर निधी** :- वित्त विभागाने या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी रूपये १२५००.०० लाख इतका निधी उपलब्ध करून दिलेला आहे.

(३) मागील ३ महिन्यापूर्वी निधी वाटप करण्यात आलेले आहे. तथापि, दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला नाही.

(४) **ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.**

(५) **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.**

(६) **वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- या योजनेअंतर्गत बँका लाभार्थी आहेत.**

(७) **बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.**

(८) **खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.**

(९) **साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी :- लागू नाही.**

६. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V0004-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन) आयुक्त, सहकार, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

७. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०१) (१०) - शेतकऱ्यांना अल्पमुदती पीक कर्ज पुरवठा करण्यासाठी १% व्याज दराने अर्थसहाय्य. (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१५०१) ३३, अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

८.  सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.३८०/१४३१, दि. २४/११/२०२१ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र. ५४०/२०२१/व्यय-२, दि. ०१/१२/२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९.  सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१४१४४९५००४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2021.12.14 14:51:29 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी तथा सह निबंधक**

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
५. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
६. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे.
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, लि. मुंबई.
८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (कार्या. १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवड नस्ती-१८-स.